**महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत अग्निशमन केंद्र उभारणी साठी निधी मंजूर करणे व अग्निशमन सेवेतील कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण याकरिता संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई यांना जबाबदार अधिकारी म्हणून नियुक्त करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.६५/नवि-२०**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक:- २२ मार्च, २०१७

वाचा :- शासन निर्णय क्रमांक अशस १४०७/३६०/प्र.क्र.२११/नवि-२० दिनांक ३१ ऑगस्ट, २००९.

**प्रस्तावना** :-

महाराष्ट्रातील ड-वर्ग महानगरपालिका, नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तूट भरुन काढण्याकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने “महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान” राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर निर्णयाची अंमलबजावणी आवश्यक त्या परिणामकारकतेने होताना दिसून येत नाही.

२. महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत राज्यातील नागरी संस्थांकडून अग्निशमन केंद्र उभारणे तसेच अग्निशमन वाहन खरेदी करणे याकरिता निधी मंजूर करण्याचे पुरेसे प्रस्ताव शासनास प्राप्त होत नाहीत तसेच नगरपालिका/नगरपरिषदांतर्गत अग्निशमन विभागाच्या कर्मचाऱ्यांना कुठलेही प्रशिक्षण दिले जात नाही, असे अध्यक्ष, लोकलेखा समिती यांनी लोकलेखा समितीचे साक्षीचे वेळी शासनाच्या निदर्शनास आणून दिले आहे. या पार्श्वभुमीवर काही उपाययोजना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत अग्निशमन केंद्र उभारणी तसेच अग्निशमन वाहन खरेदी याकरिता निधी मंजूरीचे प्रस्ताव शासनास प्राप्त होण्यासाठी तसेच सर्व नगरपालिका/नगरपरिषदांतर्गत अग्निशमन सेवांमध्ये कार्यरत असलेल्या सर्व कर्मचाऱ्यांचे फायर सर्व्हीस कॉलेज, नागपूर अथवा इतर मान्यताप्राप्त संस्थांकडून प्राधान्याने प्रशिक्षण करुन घेण्याकरिता संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई यांना जबाबदार अधिकारी म्हणून नियुक्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत राज्यातील नागरी संस्थांकडून अग्निशमन केंद्र उभारणी तसेच अग्निशमन वाहन खरेदी याकरिता प्रस्ताव प्राप्त करुन शासनास प्राधान्याने सादर करावेत. त्याचबरोबर अग्निशमन केंद्राकरिता पुरेसा कर्मचारीवर्ग उपलब्ध करुन घेणे तसेच त्या कर्मचाऱ्यांना फायर सर्व्हीस कॉलेज,

नागपूर अथवा अन्य मान्यताप्राप्त संस्थांकडून प्रशिक्षित करुन घेण्याबाबत आवश्यक कार्यवाही संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांच्या सहकार्याने कालबध्द कार्यक्रमाची आखणी करुन करावी व सर्व नगरपालिका/नगरपरिषदांना आवश्यक प्रशिक्षित कर्मचारीवर्ग उपलब्ध होईल याची काळजी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३२२१३३५५३२२२५ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.03.22 14:48:18 +05'30'

(ज. ना. पाटील)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा.लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
९) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
१०) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
११) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१२) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायत (सर्व)
१३) संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रुझ (पूर्व), मुंबई
१४) निवडनस्ती (नवि-२०)